राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रात क्षेत्रविकास कार्यक्रम राबविण्यासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात बचत झालेल्या निधीपैकी नवीन विकासकामांना मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्यांक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : नाक्षेवि -२०२१/प्र.क्र.१०४/का.९,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दि. ०३ मार्च, २०२२

<u>संदर्भ</u> :- १) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.७६/का.९, दि. १८ जून,२०१५.
२) शासन पूरकपत्र, अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.५/का.९, दि. ९ मार्च,२०१६.
३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग नाक्षेवि -२०२०/प्र.क्र. २७ /का.९, दि.०३/०७/२०२०.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. संकीर्ण -१०२१/ प्र.क्र.६३/अर्थोपाय, दि.२४/०९/२०२१.
५) सहायक आयुक्त एम/पूर्व विभाग, गोवंडी, बृहन्मुंबई महानगर पालिका, मुंबई यांचे क्र. स.आ. /एम-पूर्व /-/जन/स.अ. (परि-१) / दि.०४/०२/२०२२ चे पत्र व सहपत्र.

**प्रस्तावना :-**

अल्पसंख्याक विकास विभागाने सन २००८-०९ या वर्षापासून राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित केला असून उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये ही योजना सन २०१५-१६ या वर्षात राबविण्यास मंजुरी देण्यात आली आहे. या योजनेंतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात संदर्भ क्र. ३च्या शासन निर्णयातील **परिशिष्ट- "अ"** येथील अ.क्र. ४ मध्ये मुंबई उपनगर जिल्हयातील, मुंबई महानगर पालिका करिता एकूण २१ मंजूर विकासकामांसाठी एकूण रुपये २,५०,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता संदर्भ क्र. ५ येथील सहायक आयुक्त एम/पूर्व विभाग, गोवंडी, बृहन्मुंबई महानगर पालिका, मुंबई यांनी दिलेल्या अहवालानुसार रु.६९,९१,०७०/- (अक्षरी रुपये एकोणसत्तर लक्ष एक्क्याण्णव हजार सत्तर फक्त) इतका निधीची बचत होत आहे. त्यामुळे सदर बचतीच्या शिल्लक निधीमधून मुंबई उपनगर जिल्हाकरिता नवीन विकासकामांना मान्यता देण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्यातील बहुल अल्पसंख्याक नागरी क्षेत्र विकास योजनेकरिता सन२०२०-२१या आर्थिक वर्षात उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयासोबतच्या **परिशिष्ट -"अ"** मध्ये दर्शविल्याप्रमाणे **एकूण रु.**४,४६,००,०००/- (अक्षरी रूपये चार कोटी शेहचाळीस लक्ष फक्त) एवढा निधी मंजूर विकासकामांकरिता संबधित महानगरपालिका/म्हाडा/नगरपालिका/नगर पंचायत ज्या जिल्हयांमध्ये

स्थित आहेत, त्या जिल्हयांचे जिल्हाधिकारी यांना स्वाधीन करण्यात आला आहे. त्यातील अ.क्र. ४ मध्ये मुंबई उपनगर जिल्हयातील, मुंबई महानगर पालिका करिता एकूण २१ मंजूर विकासकामांसाठी एकूण रुपये २,५०,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. संदर्भ क्र. ५ येथील सहायक आयुक्त एम/पूर्व विभाग, गोवंडी, बृहन्मुंबई महानगर पालिका, मुंबई यांनी दिलेल्या अहवालानुसार रु.६९,९१,०७०/-(अक्षरी रुपये एकोणसत्तर लक्ष एक्क्याण्णव हजार सत्तर फक्त) इतका निधीची बचत होत आहे. सदर बचतीच्या निधीपैकी मुंबई उपनगर जिल्हयातील, मुंबई महानगर पालिका करिता परिशिष्ट-अ मध्ये नमूद एकूण ३ नवीन विकासकामे मंजूर करुन रु.६०,४०,०००/-**(अक्षरी रु. साठ लक्ष चाळीस हजार फक्त )इतका निधी खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.**

२. संबंधित महानगरपालिका/म्हाडा/नगरपालिका/नगरपंचायतींना मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी, नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. **परिशिष्ट -"अ"** मध्ये दर्शविलेली कामे इतर योजनेतून करण्यात आलेली नाहीत, याची शहानिशा व खातरजमा संबधित जिल्हाधिकारी यांनी करावी व जर सदर काम इतर योजनेतून मंजूर केले असल्यास, त्या बदल्यात सदर योजनेतील इतर काम मंजूर निधीच्या मर्यादेत राहून बदल करण्याचे अधिकार संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना राहतील. उपरोक्त कामाच्या बदल्यात सदर योजनेतील इतर काम करणे शक्य नसल्यास त्यासाठी वितरीत केलेला निधी शासनाच्या कोषागारात तात्काळ जमा करण्यात यावा. तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांनी उपरोक्त कामांचे अंदाजपत्रक बांधकाम विभागाकडून प्राप्त करून घ्यावे. याबाबतची सर्व कागदपत्रे शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार प्राप्त करून घेण्याची कार्यवाही संबधित जिल्हाधिकारी यांनी करावी. त्यानंतर त्यांना प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात यावी व निधी संबंधित महानगरपालिका/म्हाडा/ नगरपालिका/नगरपंचायत यांना सुपूर्द करण्यात यावा. तसेच सदर कामे महानगरपालिका/ म्हाडा/नगरपालिका/नगरपंचायतीच्यां बांधकाम विभागामार्फत रितसर करुन घेण्यात यावीत.

३. राज्यातील महानगरपालिका/म्हाडा/नगरपालिका/नगरपंचायतींनी मागणी केल्यानुसार ज्या विवक्षित प्रयोजनासाठी निधि मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी संबंधित महानगरपालिका/म्हाडा/ नगरपालिका/ नगरपंचायतींना निधी खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबधित जिल्हाधिकाऱ्यांकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर संबंधित महानगरपालिका/ म्हाडा/नगरपालिका/नगरपंचायतींना सहा महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या **परिशिष्ट "ब"** मध्ये विहित केलेल्या नमुन्यात जिल्हाधिकाऱ्यांनी अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. अल्पसंख्याक नागरी क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील महानगरपालिका/ म्हाडा/ नगरपालिका/नगरपंचायतींनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

४. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेडई-१, मुख्यलेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) अल्पसंख्याक

बहुल क्षेत्रात क्षेत्रविकास योजनेकरिता सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५-ए-१३१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या वर्षाकरिता मंजुर अनुदानापैकी बचत झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या दि.२४/०९/२०२१ रोजीच्या शासननिर्णयातील मार्गदर्शक सूचनांस अनुसरुन सदर निधी मात्र दि.३१ मार्च,२०२२ पर्यंत खर्च करण्यात यावा या अटीच्या अधीन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. “सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका -१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७ एप्रिल,२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.”

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३०३१६५२३२७३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: CN = DINESH MADHAVRAO SONAVANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.03.03 16:54:23 +05'30'

**(दि. मा. सोनवणे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. संबंधित विभागीय आयुक्त,
१०. आयुक्त, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
११. संबंधित जिल्हाधिकारी,
१२. आयुक्त, संबंधित महानगरपालिका,
१३. मुख्याधिकारी, संबंधित नगरपालिका,
१४. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
१५. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
१७. निवडनस्ती ( का-९)

**शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. नाक्षेवि -२०२१/प्र.क्र.१०४/का.९,**
**दि. ०३ मार्च,२०२२**
**परिशिष्ट-"अ"**

| अ.क्र | जिल्हा | म.न.पा. / न.पा./ न.प. | कामाचे नांव | मंजूर निधी रु. (लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | मुंबई उपनगर | मुंबई महानगर पालिका | वार्ड क्र.१४५, एम पूर्व येथील टी. डब्लू लाईन, डि-सेक्टर, श्री.क्लीनिक, मिर्झा गालिब रोड, चिताकॅम्प, ट्रॉम्बे येथे गटारे व पायवाटा करणे | २०.०० लक्ष |
| २ | | | वार्ड क्र.१४५, एम पूर्व येथील जी-एच लाईन, डि-सेक्टर, मिर्झा गालिब रोड, चिताकॅम्प, ट्रॉम्बे येथे गटारे व पायवाटा करणे | १९.०० लक्ष |
| ३ | | | वार्ड क्र.१४५, एम पूर्व येथील आय लाईन, डि-सेक्टर, मिर्झा गालिब रोड, चिताकॅम्प, ट्रॉम्बे येथे गटारे व पायवाटा करणे | २१.४० लक्ष |
| | | | **एकूण** | **६०.४० लक्ष** |
| | **(अक्षरी रु. साठ लक्ष चाळीस हजार फक्त )** | | | |

DINESH MADHAVRAO SONAVANE
Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: CN = DINESH MADHAVRAO SONAVANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.03.03 16:55:21 +05'30'

**(दि. मा. सोनवणे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय ,अल्पसंख्याक विकास विभाग क्र. नाक्षेवि -२०२१/प्र.क्र.१०४/का.९, दि. ०३ मार्च,२०२२.**

**परिशिष्ट - "ब"**

**उपयोगिता प्रमाणपत्र**

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांसाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग **नाक्षेवि -२०२१/प्र.क्र.१०४ /का.९, दि.०३ मार्च,२०२२.** अन्वये वितरित केलेला रु. /- (अक्षरी रु. ) एवढा निधि पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे :-

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ. | रु. |
| ब. | रु. |
| क. | रु. |
| ड. | रु. |

*****